सन २०२२-२०२३ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCP) अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२२/प्र.क्र.५५/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एनआरएलएम-२०११/प्र.क्र.१९६/योजना-३, दिनांक १८ जुलै, २०११.
२. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२२/प्र.क्र.५५/योजना-३, दिनांक ०२ जून, २०२२.
३. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२२/प्र.क्र.५५/योजना-३, दिनांक १९ ऑक्टोबर, २०२२
४. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/०१/२०२२-आरएल (एनआरएलएम_३३ बी), दिनांक १२ डिसेंबर, २०२२.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/५६६२/२०२२, दिनांक २३ डिसेंबर, २०२२.
६. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प(विघयो), दिनांक १४ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCP) अर्थसहाय्य या योजनेकरिता पहिल्या हप्त्याचा दुसरा टप्पा म्हणून रु.६६,२३,६५,०००/- इतका निधी संदर्भाधीन क्र.४ अन्वये वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२२-२३ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्ग (SCP) केंद्र हिस्सा (२५०१ ए०८४) याकरिता रु.१८८,५०,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु.८०,१२,३९,०००/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे तसेच केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ ए०९३) याकरिता रु.१२५,६७,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु.५३,४१,५८,६६६/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे. आता सदर केंद्र हिस्सा रु.६६,२३,६५,०००/- व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.४४,१५,७६,६६७/- असा एकूण रु.११०,३९,४१,६६७/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला (MSRLM) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCP) अर्थसहाय्य केंद्र हिस्सा (२५०१ ए०८४) याकरिता केलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून रु.६६,२३,६५,०००/- (रुपये सहासष्ट कोटी तेवीस लाख पासष्ट हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ ए०९३) याकरिता केलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून रु.४४,१५,७६,६६७/- (रुपये चौव्वेचाळीस कोटी पंधरा लाख शहाहत्तर हजार सहाशे सदुसष्ट फक्त) असा एकूण रु.११०,३९,४१,६६७/- (रुपये एकशे दहा कोटी एकोणचाळीस लाख एक्केचाळीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.६६,२३,६५,०००/- इतका खर्च "मागणी क्र.एन-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) एमएसआरएलएम अंतर्गत वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०१ ए०८४)" या लेखाशीर्षाखाली व रु.४४,१५,७६,६६७/- इतका खर्च "मागणी क्र.एन-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०२) एमएसआरएलएम अंतर्गत वित्तीय सहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य (२५०१ ए०९३)" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पीत तरतूदी मधून भागवावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय / उपलेखाशीर्षानिहाय तसेच साध्य झालेल्या भौतिक उद्दीष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

५. सदर अनुदान अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठी तसेच ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४)

महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र. ५) कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याची संबंधीत अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी, अन्यथा त्यांच्यावर शासन स्तरावरुन कारवाई केली जाईल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक ०४ एप्रिल २०२२ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.८७/व्यय-१४, दिनांक १०.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२१७१५४२०७६०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2023.02.17 16:47:24 +05'30'

( अरुण व शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतींसह)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
३) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
५) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६) कक्ष अधिकारी/अर्थसंकल्प (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) वित्त विभाग (व्यय-१४) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
८) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
९) निवडनस्ती.